हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी - netaksharee@gmail.com



# तुझ्याचसाठी कितीदा तुझ्याचसाठी रे..

संपादक -
स्वप्ना कोल्हे (नाशिक)

सहसंपादक -
सोनाली घाटपांडे (पुणे)
भारती सरमळकर (मुंबई)
सचिन काकडे (मुंबई)

ई साहित्य प्रकाशन
वर्ष : दूसरे , अंक : २९
दिनांक : ०४.१०.२०१०

नेटअक्षरी

आधुनिक मराठी कवितेच्या इतिहासाचा आलेख ज्यांच्याशिवाय पूर्ण होऊ शकत नाही असे एक कवी म्हणजे कवीवर्य ना.घ.देशपांडे म्हणजेच नागोराव घनश्याम देशपांडे.कुसुमाग्रज,मंगेश पाडगावकरांसारखे महान कवी देखील त्यांचा उल्लेख गुरु म्हणून करीत.शीळ,अभिसार,खुणगाठी,गुंफण,कंचनीचा महाल असे अप्रतिम काव्यसंग्रह त्यांनी मराठी भाषेस दिले.त्यांनी मराठीत उत्कट काव्य आणलं.भावनांच्या हळुवारपणाबरोबरच खोलवरच्या गुंतागुंतीचं काव्य त्यांनी शब्दंबध्द केलं.त्यांच्या काव्यात प्रयोगशीलता आणि एक प्रकारची बंडखोरी होती.त्यांच्या काळाच्या ते बरेच पुढ़े होते.त्यांचा काळ हा स्वातंत्र्य लढ्याचा व राजकीय घडामोडींचा असल्याने त्यांच्या काळात त्यांना,त्यांच्या भावुक नाजुक कवितेला म्हणावी तशी लोकप्रियता लाभली नाही.आणि प्रसिध्दी टाळण्याच्या आपल्या स्वभावाने नंतरच्या काळातही ते म्हणावे तितके पुढे आले नाहीत.त्यांची कविता मात्र कायम नवे मार्ग धुंडाळत राहिली आणि नव्यांना मार्गदर्शन करत राहिली.अनेकांच्या डॉक्टरेटच्या थिसिसचा विषय बनली.‘खुणगाठी’ह्या काव्यसंग्रहासाठी त्यांना १९८६ मध्ये साहित्य अकादमी पुरस्काराने सन्मानित करण्यात आले.ह्या काव्यसंग्रहाच्या प्रस्तावनेत त्यांनी त्यांच्या काव्यप्रवासावर सविस्तर लिहले आहे.अशा या महान कवीच्या जन्मशताब्दी वर्षाची सांगता २१.०८.२००९ रोजी झाली.त्यानिमित्ताने नेटाक्षरीच्या ह्या विशेषांकात त्यांच्या काही बहारदार कविता सादर करीत आहोत.

- स्वप्ना कोल्हे (नाशिक)
संपादक

## * * अंतरीच्या गूढ गर्भी * *

अंतरीच्या गूढ गर्भी एकदा जे वाटले
एकदा जे वाटले ते,प्रेम आता आटले
दूर सोनेरी सुखाचे पाहिले आभास मी तू
रंगले आभाळ पूर्वी तेच आता फाटले

एकदा ज्यांतून मागे सूर संवादी निघाले
वंचनेने तोडले ते,स्नेहतंतू आतले
शेवटी मंदावलेल्या वादळी वाऱ्याप्रमाणे
राहणे झाले दिवाणे,ते गीत गाणे कोठले



## * * डाव मोडू नको * *

डाव मांडून भांडून मोडू नको,डाव मोडू नको

आणले तू तुझे सर्व,मी आणिले
सर्व काही मनासारखे मांडले
तूच सारे तुझे दूर ओढू नको

सोडले मी तुझ्याभोवती सर्व गे
चंद्र ज्योतीरसाचे रुपेरी फुगे
फुंकरीने फुगा,हाय,फोडू नको

गोकुळीचा सखा तूच केले मला
कौतुकाने मला हार तू घातला
हार हासून घालून तोडू नको

काढले मी तुझे नाव,तू देखिले
आणि माझे पुढे नाव तू रेखिले
तूच वाचून लाजून खोडू नको



* * नदीकिनारी * *

नदीकिनारी,नदीकिनारी,नदीकिनारी गं

अवतीभवती नव्हते कोणी
नाचत होत्या राजसवाणी
निळया जळावर सोनसळीच्या नवथर लहरी गं

दूसरे तिसरे नव्हते कोणी
तुझेच हसले डोळे दोन्ही
अवखळ बिजली भरली माझ्या उरात सारी गं

जरा निळया अन जरा काजळी
ढगात होती सांज पांगली
ढवळी ढवळी वर बगळयांची संथ भरारी गं

कुजबुजली भवताली राने
रात्र म्हणाली चंचल गाणे
गुडघाभर पाण्यात दिवाणे दोन फरारी गं

## * * रानारानात गेली बाई शीळ * *

रानारानात गेली बाई शीळ
राया तुला रे काळवेळ नाही , राया तुला रे ताळमेळ नाही

थोर राया,तुझं रे कुळशीळ
वाहे झरा गं,झुळझुळवाणी , तिथं वाऱ्याची गोड गोड गाणी
तिथं राया तू उभा असशील
तिथं रायाचे पिकले मळे , वरी आकाश शोभे निळे
शरदाच्या ढगाची त्याला झील
येड्यावानी फिरे रानोवना , जसा काही गं,मोहन कान्हा
हासे जसा गं,राम घननीळ
गेले धावून सोडून सुगी , दूर राहून राहिली उगी
शोभे कसा गं गालीचा तो तीळ
रानी राया गं हा फुलावाणी , फुला फुलात मी फुलराणी
बाई,सुवास रानी भरतील

फिरु गळ्यात घालुनि गळा , मग घुमव मोहन शिळा
रानी कोकिळ सुर धरतील



## * * थांब जरासा * *

मन पिसाट माझे अडले रे,थांब जरासा

वनगान रान गुणगुणले
दूरात दिवे मिणमिणले,थांब जरासा

ही खाली हिरवळ ओली
कुजबुजून बोलू बोली
तिमिराची मोजू खोली रे,थांब जरासा

नुसतेच असे हे फिरणे
नुसतेच दिवस हे भरणे
नुसतेच नको हुरहुरणे रे,थांब जरासा



# * * जाणिव * *

सांध्यरसाने रंगत रंगत , वाहत होता कोमल वारा
अवकाशाचे अंतर उजळत , उमटत होती एकच तारा

तू आणिक मी बसून तेथे , बोलत होतो सहजच काही
सहजच सारे वाटत नव्हते , त्यादिवशी पण तुला मलाही

उमजत नव्हते हे की ते वा , ती तर सजणे होती प्रीती
होती प्रीती , परंतु तेव्हा जाणिव नव्हती,जाणिव नव्हती

दैवगतीने वाहत वाहत अनेक वर्षांनंतर सजणी
असेच आलो,बघ अनपेक्षित , आपण दोघे एक ठिकाणी

पुन्हा तू नि मी बसलो येथे , बोललीस तू,मी पण काही
सहजच वाटत नाही पण ते , आज खरोखर तुला मलाही

अजाण होतो मागे आपण,नव्हती जाणिव होती प्रीती
उरली आहे आज सखे पण जाणिव नुसती,जाणिव नुसती

## * * घरदिव्यात मंद तरी * *

घरदिव्यात मंद तरी , बघ,अजून जळते वात
उजळल्या दिशा,सजणा , न कळताच सरली रात

झाडता झडेना या , लोचनातली पण धुंद
सर्व रात्रभर निजला , जिवलगा,कळीत सुगंध

जवळपास वाटेने , सुभग चालली कोणी
वाजते तिच्या भरल्या, घागरीतले पाणी

निवळले,तरी दिसतो , पुसट एक हा तारा
बघ,पहाटचा सुटला , मधुर उल्हसित वारा

झोप तू मिठी मधला , अलग हा करु दे हात
उलगडू कशी पण ही , तलम रेशमाची गाठ ?



## * * आज श्रावण उदासीन * *

गर्द पानांत,कळयांत अडखळली सर
वारा फिरतो भिरभिर
गरगरत गोल फिरते वर व्याकुळ घार
खाली बघते वारंवार

लाज वाटून अंग चोरते वेल,बघते ओलीचिंब
तिचे विस्कटलेले बिंब
गर्द जांभळया लाल ढगांत एक विजेची चकमक
तिने झाकले आहे मुख

होती फिकीर,झाली अखेर आशा फसून नवसाची
ओली नजर पावसाची
सात रंगांचे इंद्रधनुष्य रंग ढगांत विसरले
फिके होऊन पसरले

फडफडते शून्य मनांत माझ्या तुझीच आठवण
आज श्रावण उदासीन



* * तुझ्याचसाठी * *

तुझ्याचसाठी कितीदा,तुझ्याचसाठी रे
मी दुहेरी बांधल्या,खुणगाठी रे

तुझ्याचसाठी कितीदा
मी दुपारी सोसले,ऊन माथी रे

तुझ्याचसाठी कितीदा
लाविल्या मंदिरी,सांजवाती रे
कैक आल्या,संपल्या चांदराती रे

तुझ्याचसाठी कितीदा
मी जगाच्या सोडल्या रीतभाती रे



* * झंकार * *

गार वारा तू नवा शृंगार हो
रात्र झाली तू फुलांचा हार हो
जी उषा माझ्या जुन्या स्वप्नांतली
तीच तू आता पुन्हा साकार हो

या मुक्या शेजारखोलीतून तू
पैंजणांचा वाढता झंकार हो
वावगा वागेन मी तेव्हा पुन्हा
तू अटींची टांगती तलवार हो

अन पुन्हा केव्हाही मी रागावता
वादळी पाऊस धुव्वाधार हो
वेडपे मी बोललो काही जरी
हास थोडे अन तरी होकार हो

गीत माझे वेदनांनी थांबता
आत माझ्या नादवंती तार हो

## * * असाच * *

वेगळीच जात तुझी,वेगळाच ताल
तू अफाट वाट तुझी,एकटाच चाल

एकटाच चालत जा,दूर दूर दूर
गात गात तूच तुझा , एकटाच सूर

एकटाच चालत जा,उंच आणि खोल
बोल आणि ऐक पुन्हा , तू तुझा बोल

तू असाच झिंगत जा विस्मरुन पीळ
तू असाच फुंकीत जा,अर्थशून्य शीळ

अंतरात पाहत जा,भास तू तुझेच
शांततेत ऐकत जा , श्वास तू तुझेच

खोल या दरीत अशा गर्द साऊलीत
हो निमग्न तूच तुझ्या मंद चाहुलीत

रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा
ई-साहित्य प्रकाशनाचा ध्यास ‘नेटाक्षरी’ जोमाने पार पाडत आहे. दर आठवड्यात मिळणाऱ्या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणीत होतोय.नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे
६0000 मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो.
त्या व्यतिरिक्त संकेतस्थळाला भेट देऊन वाचणाऱ्यांची संख्याही लक्षणीय आहे.
हा अंक आपण आपल्या ईष्टमित्रांना फॉरवर्ड करण्यास आमची काही हरकत नाही परंतु असे करताना आमच्या आयडीचा अंतर्भाव केल्यास आम्ही आभारी राहू. मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लाभावा हीच इच्छा. आपल्यासारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक लवकरच
एक लक्ष वाचकांपर्यंत नियमित पोहचवण्याचा
आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

**– ई साहित्य प्रतिष्ठानची इतर विनामुल्य ई साप्ताहिके –**

स्वरनेटाक्षरी ऑडिओ अल्बम , बाल नेटाक्षरी , ई श्टाप

**– प्रसिध्द झालेली ई बुक्स –**

टल्लीची शाळा,मकरंदच्या त्रिवेण्या,ग्रेव्हयार्ड लिटरेचर,चार क्षण,
तो आणि ती,प्रियेचे अभंग,देशी दारुचे दुकान, ई शाळा ,
तो , मी आणि सिगरेट, मोरया, लोकल गोष्टी , मीरा

आमची ई बुक्स विनामूल्य मिळण्यासाठी - esahitya@gmail.com

हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी - netaksharee@gmail.com